बाल नेटाक्षरी

संपादिका : सौ अनघा हिरे (नाशिक)

सजावट : सौ. अनघा हिरे

मुखपृष्ठ : आदिती हिरे

प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

नाम गुम जायेगा

www.esahity.com

9869674820

E mail : balnetakshari@gmail.com

9422284116

# नेटवरची धम्माल मस्ती

बच्चे कंपनी

पंधरा वर्षांपुर्वी लोकांना इंटरनेट माहित नव्हतं. ATM नव्हतं. मोबाईल नव्हते. बहुतेक लोक कॉंप्युटर शिवायच काम करायचे. अजून पंधरा वर्षांनंतर इंटरनेट शिवाय कसलंच काम होणार नाही अशी परिस्थिती असेल. आता तुम्ही जी मुलं आहात ती मोठी झाल्यावर तुमचं पान इंटरनेट शिवाय हलणार नाही बुवा. पण तरीही तुमचे आई बाबा तुम्ही इंटरनेट्ला हात लावला की तुम्हाला रागावतात का ? इंटरनेट वर जास्त बसू देत नाहीत का ?

कारण माहित आहे ? इंटरनेट जितकं चांगलं तितकंच वाईट. इंटरनेटवर फ़सवणूक पण खूप असते. काय बघावं काय बघू नये याचं मार्गदर्शन नसेल तर मुलं कुठल्या कुठे वाहत जाऊ शकतात. फ़सू शकतात. कॉंप्युटर बिघडू शकतो. व्हायरस येतात.

त्यात इंटरनेटवर जिकडे जावं तिकडे इंग्रजीच इंग्रजी. मग आपण मराठी मुलांनी करायचं काय? आपल्याला आपलं मराठी इंतरनेट हवं की नको ? तेव्हा ई साहित्य प्रतिष्ठानने आणलंय मुलांसाठी खास मासिक. बालनेटाक्षरी. यात मराठी मुलांना लिहायला वाव आहे. आणि माहिती मिळायलाही. यातून आपण इंटरनेट कसं वापरायचं. काय बघायचं, काय टाळायचं ते सगळं समजून घ्यायचं आहे. तुम्हाला आपल्या मित्रमंडळींना काही सांगायचं असलं, गोष्ट, कविता लिहायची असली किंवा आपण काढलेली चित्रं फ़ोटो दाखवायचे असले तर आमच्या कडे पाठवून द्या. पालकांना आणि दादा ताईंना सुद्धा विनंती. आपल्या कडच्या छोट्टु कंपनीने काही कौतुक करण्यासारखं केलं बनवलं लिहीलं तर आमच्याकडे पाठवा. आपण आज कौतुक केलं तरच ती मुलं उद्या काही पराक्रम करणार ना !

आमचा पत्ता :

balnetakshari@gmail.com

# संपादकाच्या मनातले .....



बालनेटाक्षरीचा हा आजचा खास नाताळ विशेषांक .

नेटाक्षरीचे अंक आपणा सर्वांकडे नियमित येतात आपण त्याचे वाचक आहात . बालनेटाक्षरीचा पहिला भाग बालदिनाच्या दिवशी प्रसिध्द झाला . सगळ्यांचे भरभरून अभिनंदनाचे फोन, मेल मिळाले पण बालनेटाक्षरीचे खरे यश हे तेव्हाच आहे जेव्हा आमच्या बाल मित्रांचेही लिखाण , कविता , निबंध चित्रे आम्हाला मिळतील. आणि जेव्हा बाल मित्रांनी ह्या बाल नेटाक्षरीला आपले मासिक समजून त्यात भाग घेतला ... तेच खरे सर्वात मोठे यश ..

बालनेटाक्षरीचा अंक तयार करतांना मुलांच्या अभिरुचिचा विचार केला आहे . त्यांना काय आवडेल किंवा त्यानी काय वाचाव ह्या दृष्टीने विचार करुनच हा अंक तयार करण्यात आला. लक्षात आल म्हणून सहजच तुम्हाला सांगते , इतके दिवस मीच खर घाबरयाची की मुलांच्या हातात नेट पडायला नको . किंवा जर मुल नेट वापरत असतील तर त्यांच्या जवळच बसून राहावे . उगाच नाग समजुन काठी बडवण्यात काय अर्थ . त्या एवजी थोड समोर जाऊन शहानिशा केलेलीच बरी ना!

मी जेव्हा नेटवर काम करायला लागले तेव्हा मला जाणवले की नेटवर सुद्धा मुलांसाठी वाचण्यासारखे खुप काही आहे फ़क्त योग्य मार्गदर्शन असेल तर आपण मुलांची एक समृध्द दिशा ठरवू शकतो.

मी स्वत:मग बसून मुलांच्या हाताळण्याजोग्या नेट साईट शोधून काढल्या, त्यांचा स्वत: व्यवस्थित अभ्यास केला आणि माझी खात्री पटल्यावरच त्या सर्व साईट फेवरेट मध्ये सेव केल्या . वेळोवेळी ह्या सर्व साईटविषयी मी आपल्याला सांगेलच.

नाम काकांनी बालनेटाक्षरीच्या बाबतीत माझ्यावर विश्वास टाकून त्यांचे ' बालनेटाक्षरी ' हे पिल्लू माझ्याकडे संगोपनाला दिले . त्यांनी दाखवलेल्या विश्वासाबद्दल मी त्यांची ऋणी आहे .

## सर्वांना नाताळच्या हार्दिक शुभेच्छा

सौ अनघा हिरे (नाशिक)



# अनुक्रमणिका

## मूलमंत्र : ९ साक्षात्कार



आमच्या गंमत शाळेत मुले आपापल्या सोयीने बसतात. मुले जर रांगेत बसली असतील तरच वर्गात शिस्त असते, असं काही नाही. पण परवा वर्गात गेलो तर मुले चक्क एका रांगेत बसलेली व सिमरन रांगेच्या बाहेर. हे पाहून मला गंमत वाटली.

मुले म्हणाली,"आज आपण सुसंगत-विसंगत शिकाणार आहोत. म्हणून आम्ही मुद्दामहूनच अशी रचना केलीय. आम्ही रांगेत बसलेली सगळी मुले सुसंगत आणि ही सिमरन मात्र विसंगत."

हात उंचावून गणेश म्हणाला,"आधी आम्ही सगळेच रांगेत बसलो होतो पण सिमरन काही आमचं ऐकत नाही." मुलांचं बोलणं फारसं मनावर न घेता म्हणालो,"चला. वर्गातच बसून नाही शिकता येणार सुसंगत-विसंगत. आपण जरा बाहेर फेरी मारुन येऊ."

घराच्या खिडक्यांना बाहेरच्या बाजूंनी लोखंडी ग्रील लावलेली असतात. दरवाज्यांच्या बाहेर पण लोखंडाचा एक सेफ्टी दरवाजा असतो. बाहेर फिरायला जाऊ तेव्हा खिडक्यांच्या ग्रील्स व सेफ्टी दरवाजे यांची डिझाइन्स काळजीपूर्वक पाहायची असं ठरलं. कारण ती सुसंगतच असतात.

आम्ही सर्वांनी मिळून वेगवेगळ्या प्रकारची सोळा सुसंगत डिझाइन्स पाहिली. मुले फारच प्रभावित झाली होती. फिरायला गेल्यावर असं काही पाहायचं असतं, हा त्यांच्यासाठी मोठाच शोध होता. नेहमीचाच परिसर आज ते वेगळ्या दृष्टीने पाहात होती.

"रोज मी याच वाटेने शाळेत येतो. पण इतकी डिझाइन्स आजच पाहिली. कधी एकदा हे घरी जाऊन आईला सांगतो असं झालंय मला." जयेश नमूला सांगत होता. "अरे आमच्या पण खिडकीच्या ग्रीलचं डिझाइन सुसंगत आहे, हे घरात कुणालाच माहीत नसणार बघ. मी घरी गेल्यावर बाबांना विचारणारच आहे." नमू म्हणाली.



वर्गात आल्यावर फळ्यावर एक

मोठा चौकोन काढला. आता तुम्ही तुमच्या खोलीच्या खिडकीच्या ग्रीलचं डिझाइन काढा. डिझाइन हवं एकदम सुसंगत. पण एक अट आहे. तुम्ही आतापर्यंत जी काही डिझाइन्स पाहिली आहेत त्यापैकी कुठलंही काढायचं नाही. खिडकी तुमची आणि डिझाइन पण तुमचंच!

आता मुले कामाला लागली. वेगवेगळी धमाल पण सुसंगत डिझाइन्स मुलांच्या वहीत दिसू लागली. थोड्याच वेळात "माझी वही पाहा... आधी माझं पाहा...हे पाहा एकदम सही डिझाइन..." असा मुलांचा गलका सुरू झाला. मुलांचा उत्साह उतू चालला होता. नमू मात्र एकदम शांत होती. नमूच्या जवळ गेलो. तिने वहीत एक चौकोन काढला होता. त्या चौकोनात मध्यभागी एक मोठा गोल काढला होता व दोन कोपऱ्यात दोन छोटे गोल.



हातातली वही उंचावत नमू म्हणाली,"कशी आहे माझ्या खिडकीची ग्रील?" मला वाटलं, तिला या गोलात काही डिझाइन काढायचं आहे. आणि म्हणून ती विचारते आहे. आता हिला काय सुचवावं याचा मी विचार करू लागलो.

“आमच्या कडे कुत्रा आहे. त्याचं नाव काळू. बाबांनी रात्री दरवाजा बंद केला की त्याला घरात येता येत नाही. मग तो थोडावेळ भुंकतो आणि मग अंगाचं मुटकुळं करुन दाराबाहेरच पडून राहातो. पण माझ्या खिडकीला जर असं ग्रील लावलं ना तर काळू त्यातून आत येईल. माझ्या खोलीत येईल.



मग माझ्या मित्राला रात्रभर घराबाहेर पडून राहायला नको.”

नमूने असं सांगताच मला एक नवीनच साक्षात्कार झाला!

‘खिडकीतून कुणीसुध्दा आत येऊ नये किंवा नुसता हातसुध्दा आत घालू नये’ म्हणूनच आतापर्यंत आम्ही मोठी माणसं खिडक्यांना ग्रील लावत होतो. कुणीतरी आत येईल या भीती पोटीच ग्रील्सची डिझाइन्स सुसंगत करुन घेत होतो.

ग्रील आणि मज्जाव हे समानार्थी शब्दच आहेत असाही आमचा समज होता.

पण जेव्हा नमू म्हणाली ‘मित्राला घरात येण्यासाठी ग्रील!’ तेव्हा मी चमकलोच. इतके दिवस आपण चुकीचा विचार करत होतो याची जाणीव झाली.

मुले प्रेम जाणतात म्हणून ती निर्भय असतात. आपण प्रेम करायला आणि ते ओळखायला ही कमी पडतो म्हणून आपल्याला प्रत्येक खिडकीवर बाहेरुन घट्ट बसवावी लागते एक मजबूत ग्रील. आणि या ग्रीलचं डिझाइन असतं आपल्या मनातल्या भितीशी सुसंगत!!

नमूने माझ्या मनातल्या खिडकीवरची ग्रील अलगद सैल केली!

तुम्हाला काय वाटतं, तुमच्या ग्रीलचं डिझाइन कशाशी सुसंगत आहे?

मला कळवाल?

मी तुमच्या ‘खिडकीतून येणाऱ्या’ पत्रांची वाट पाहातोय.

.........................................– राजीव

तांबे. rajivcopper@yahoo.co.in

# **नाताळ (ख्रिसमस)**

नाताळ हा मुख्यत्व्ये २५ डिसेंबरला ख्रिश्चन देवता येशू ख्रिस्त याच्या



जन्मदिवसानिमित्त साजरा केला जाणारा ख्रिश्चन सण आहे. काही ठिकाणी नाताळ २५ डिसेंबरऐवजी ६, ७ किंवा १९ जानेवारीला साजरा केला जातो. ख्रिश्चन श्रद्धेनुसार नाताळ हा सण १२ दिवसांच्या ख्रिसमस्टाईड नावाच्या पर्वाची सुरुवात करतो.

या सणात एकमेकांना विविध भेटवस्तू, शुभेच्छापत्रे देऊन परस्परांचे अभिनंदन करण्यात येते. या काळात आपापल्या घरांना रोषणाई करून सजवले जाते. ख्रिसमस वृक्ष सजावट हा या सणाचा एक घटक आहे. याच दिवशी रात्री सांताक्लॉज लहान मुलांसाठी भेटवस्तू वाटतो असे मानले जाते.

आपल्या अमावास्या, पौर्णिमा या तिथी जशा चंद्रावर अवलंबून असतात तसा प्रकार इसवीसनाच्या ख्रिस्ती कालगणनेत नाही. तिथे सूर्य भ्रमणालाच अधिक महत्त्व आहे आणि २५ डिसेंबरला आपले सूर्यमहाराज नेहमीपेक्षा थोडे कमीच वेळ दर्शन देत असतात.

२१ डिसेंबरचा दिवस हा वर्षातील सर्वांत छोटा दिवस. दिवस छोटा याचा अर्थ रात्र मोठी. त्यामुळे २५ डिसेंबरची रात्र ही तुलनेने मोठीच असणार. या मोठ्या रात्रीत मेणबत्त्या पेटवाव्यात, आनंदोत्सव साजरा करावा, असे कोणाला

वाटले तर ते योग्यच ठरेल. शिवाय हा दिवस येशू ख्रिस्ताचा जन्मदिवस. आता येशू ख्रिस्ताचा जन्मदिवस म्हणून हा दिवस मानला जात असला तरी पूर्वी येशू ख्रिस्ताचा जन्मदिवस ६ जानेवारी मानला जात असे.

जवळपास साडेसोळाशे वर्षांपूर्वी त्या वेळच्या पोप महाशयांनी हा दिवस २५ डिसेंबर हा मानावा असा निर्णय दिला. त्यांनी येशूख्रिस्ताचा जन्मदिन २५ डिसेंबर रोजी साजरा करावा, असे फर्मान काढले आणि त्या वेळेपासून हा दिवस २५ डिसेंबरला साजरा केला जाऊ लागला.

जगभरचे ख्रिस्तानुयायी या दिवशी आनंद व्यक्त करतात. साधू, संत, महात्मे यांची जयंती साजरी करण्याची प्रथा आणि परंपरा सर्व जगभर पाळली जाते.




जगाच्या बऱ्याच मोठ्या भागात ख्रिसमसचा सण मध्यरात्री साजरा केला जातो, तर या धर्ममताचे काही अनुयायी, काही पंथ हे मात्र २५ डिसेंबरच्या सायंकाळी हा दिवस साजरा करतात. भारतीय धर्म-संस्कृतीशी ऋणानुबंध जोडून दाखविणारा आणखी एक विशेष या २५ डिसेंबरशी निगडित आहे.

प्राचीन काळात रोम राज्यात २५ डिसेंबर हा दिवस सूर्याची जयंती म्हणून मानला जात होता.

काळोख म्हणजे अंधार हा माणसाला भयप्रद वाटतो. तो जणू आपला शत्रू आहे, अशी भावना माणसाच्या मनात पूर्वापार रुजलेली आहे. अंधार दूर

करून सगळीकडे प्रकाशाची उधळण करीत वावरणारा सूर्य म्हणजे आपला मित्र वाटतो. सूर्याचे एक नावच मुळी ' मित्र ' असे आहे.

आपली धर्मसंस्कृती सूर्यपूजक आहे. २५ डिसेंबर या दिवशी प्राचीन रोम संस्कृतीने सूर्याशी जसे नाते जोडून ठेवले त्याचप्रमाणे मोठ्यात मोठ्या दिवसाशी आपल्या मोठ्यात मोठ्या सणाचे नाते जोडून ख्रिस्तानुयायांनी एक सांधा जोडून घेतला किंवा जाणता-अजाणता त्यांच्याकडून जोडला गेला, असे म्हटले पाहिजे.

वर्षातील सर्वांत तेजस्वी अशा पौर्णिमेनंतर येणाऱ्या अमावास्येला दीपोत्सव साजरा करून आपणही जणू अंधारातून प्रकाशाकडे वाटचाल करण्याची तळमळच व्यक्त केली आहे. आश्विन कृष्ण अमावास्येला दुसऱ्या दिवशी उगवणाऱ्या सूर्याला, नव्या विक्रम संवताच्या नवीन सूर्याला आपण सर्वजण पिढ्यान्‌पिढ्या वंदन करीत आलो आहोत.

धर्म आणि धर्मदैवते वेगळी असली तरी सर्व जगावर सोनेरी किरणांची खैरात करणारा आणि अखिल विश्वाचा जणू आत्माच असलेला सूर्य मात्र उभ्याआडव्या अनंत आभाळात एकच.



## *बडबडगीत (परीराणी)*




एक होती तान्हुली
छान परी सानुली

सकाळी लवकर उठायची
मधाची बोटं चाटायची

चॉकलेट गोळ्या खायची
भल्या सकाळी नहायची

एक दिवस झाले काय
दात तिने घासलेच नाय

मग तोंडात झाला बाऊ
हळुहळु लागे दात खाऊ

नंतर तिचे पडले दात
एक नाही एकुण सात

पोरं तिला लागली चिडवु
हसुन हसुन लागली रडवु

रडत रडत ती आली घरी
दात घासुन झाली बरी

आताशा ती खुशीत असते
रोज सकाळी दात घासते

खळखळून हसते फार
परी झाली सुंदरशार

-प्रसुन (प्रवीण सूर्यवंशी)

बंडोपंत रागारागाने हॉटेलच्या मॅनेजरकडे गेले.
"या हॉटेलचे वेटर बेजबाबदार आहेत. मी त्याला दाढीसाठी पाणी आणायला सांगितलं तर त्याने हे गटारातलं पाणी आणून दिलं."
मॅनेजर : "आपण काहीतरी गडबड करताय. हा तर मी आपल्यासाठी पाठवलेला चहा आहे."

गुरुजी: काय रे दोन दिवसांपासुन शिकवणीला नाही आलास ते?
विद्यार्थी: त्याचे काय आहे गुरुजी, माझ्याकडे एकच कुर्ता पायजमा आहे... परवा तो धुवायला टाकला होता म्हणून नाही आलो.
गुरुजी: मग काल का नाही आलास? OneSmartClick.Com
विद्यार्थी: आलो होतो गुरुजी...पण अंगणात तुमचा कुर्ता पायजमा वाळताना दिसला, म्हणून परत गेलो!

दोन गुरुजी गप्पा मारत असतात.
पहीला: अरे मला टाटा आणि बिर्ला या दोघांची पुर्ण मालमत्ता मिळाली तर मी त्यांच्यापेक्षा जास्त पैसा कमवेल.
दुसरा: कशाला उगाच फुशारक्या मारतोस.ते कसे शक्य आहे.
पहीला: का नाही? सकाळ संध्याकाळ दोन शिकवण्या सुध्दा घेईन ना.

जज: बोल मरण्यापूर्वी तुझी कोणती इच्छा आहे?
कैदी: माझ्याऐवजी तुम्ही फाशी जावे

दिर्घ आजाराने त्रासलेले अण्णा डॉ. कर्वेकडे जातात.
डॉ. कर्वे: तुमचे फॅमिली डॉक्टर कोण?
अण्णा: डॉ. देशपांडे OneSmartClick.Com
डॉ. कर्वे: अहो ते देशपांडे डॉक्टर मुर्खासारखा चुकीचा सल्ला देतात. तुम्हाला कोणता सल्ला दिला?
अण्णा: तुमच्याकडे जाण्याचा

भिमाबाईंना वजन कमी करण्यासाठी डॉक्टरांनी घोडदौडीचा सल्ला दिला....महिनाभर रपेट केल्यावर त्यांनी वजन मोजलं तर चक्क २० किलोने कमी....घोड्याचं...

# जगाची ओळख



नवीन पुस्तकाची ओळख
नवीन वेबसाईटची ओळख

# “डॉट कॉम”

बर मग बाल मित्रानो मागच्या महिन्याच्या अंकात मी तुम्हाला अवकाशवेध या साईट बद्दल सांगितलं होत आठवतंय ना !

मग मला सांगा किती जणांनी त्या साईटला विजीट दिली? त्या साईटवरती तुम्हाला काय काय आवडल? मला सांगितलं नाही तुम्ही .बर

आज पुन्हा मी तुम्हाला मराठी नव्या साईट विषयी सांगणार आहे. त्या साईटचे नाव आहे ‘वनस्मार्टक्लिक डॉट कॉम’

**http://www.onesmartclick.com/marathi/**

तर या साईट वर तुम्हाला मराठी गोष्टी , गाणी कविता जोक सगळ काही बघायला मिळणार .. ही वेबसाईट तयार केली आहे प्रशांत एन म्हात्रे यांनी . प्रशांत दादांनी ही वेब साईट खूप सुंदर डिझाईन केली आहे . आता ह्या वेब साईटला भेट द्यायची आणि प्रशांत दादांना सांगायचं तुम्हाला काय आवडलं आहे आणि अजून तुमच्या नवीन आयडिया पण त्यांना सांगायच्या प्रशांत दादांचा पत्ता

**Email prashant n mhatre @yahoo.कॉम** हा आहे .

आणि माझा पत्ता तुम्हाला माहीतच आहे ना!

अनघा हिरे

# “पुस्तक मेळा”



पुस्तकाची ओळख तर खूप करायची आहे पण आधी तुम्हाला एक गंमत सांगते , नासिक मध्ये नुकताच नॅशनल बुक ट्रस्ट,इंडिया या संस्थेचा पुस्तक मेळा आयोजित केलेला . आणि आशर्याची गोष्ट अशी की लहान मुल या पुस्तक मेळ्यात जास्त संखेने उपस्थित राहिले त्यांनी आपल्या आई बाबांना पुस्तक खरेदी करायलाही सांगितले . मला हे बघतांना फार मजा वाटायची की मुल घरी जातांना आपल्या बरोबर तीन चार पिशव्या भरून पुस्तक नेतायेत . आता या पुढे मला तुम्हीच सांगायचे तुम्ही कोणते पुस्तक वाचले आणि त्यात तुम्हाला काय आवडले आपल्याला आवडलेल्या पुस्तक विषयी प्रत्येकाने १० ते १५ ओळीत लिहायचे आणि आपल्या फोटोसह आम्हाला पुस्तक परीक्षण पाठवायचे .मग दर महिन्याला आपण एक एक मित्र मैत्रिणीचे पुस्तका विषयीचे मत प्रसिद्ध करू .पुस्तक वाचतांना खरच काय मजा येते . आपण मित्रांच्या वाढदिवसाला पण आता छान छान पुस्तकेच द्यायचे अस ठरवूनच ठेवायचे .



## हॅनाची सुटकेस

**कॅरन लीवाईन**

मराठीअनुवाद . माधुरी पुरंदरे

मुलांच्या आणि मोठ्यांच्याही हृदयाला स्पर्श करणारी एक विलक्षण सत्यकथा .... हॅनाची सुटकेस

टोकियोतील ' हओलोकास्ट एजुकेशन सेंटर ' या मुलांसाठी चालवल्या जाणार्या केंद्रावर २००० सालच्या मार्च महिन्यात एक सुटकेस येऊन पोहोचली त्यावर पांढर्या रंगात लिहील होत 'हॅना बॅन्डी, १६ मे १९३१- - अनाथ '.

ही सुटकेस पाहून मुलांच्या मनात अनेक प्रश्न निर्माण झाले.. कि हॅना कोण ? तिचं वय काय?

सेन्टरच्या संचालिका मुलांच्या प्रश्नाचे उत्तर शोधायला निघाली हॅनाचा शोध घेत ती जपानमधून युरोप पर्यंत आणि पुढे कॅनडापर्यंत पोहोचली काळाच्या उदरात गडप झालेल्या हॅनासाठी ती भूतकाळाच्या भुयारात ७० वर्षे मागेही गेली .

तिच्या शोधाचीच ही यशस्वी आणि दुखद कहाणी !!!

## हॅनाची सुटकेस

# SUDOKU---- NO.. 2

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 2 | | 1 | 6 | 3 | 4 |
| | 4 | | 2 | 5 | |
| 1 | 2 | 5 | | 6 | 3 |
| 4 | 6 | | 5 | | |
| | 1 | 4 | | 2 | 6 |
| 6 | 3 | 2 | 1 | | 5 |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| 2 | 5 | 1 | 6 | 3 | 4 |
| 3 | 4 | 6 | 2 | 5 | 1 |
| 1 | 2 | 5 | 4 | 6 | 3 |
| 4 | 6 | 3 | 5 | 1 | 2 |
| 5 | 1 | 4 | 3 | 2 | 6 |
| 6 | 3 | 2 | 1 | 4 | 5 |

Answer



**यात किती कीटक आहेत ? कोणी मोजेल का?**



## मुलांनो, पाठ्यपुस्तकातील प्रतिज्ञा आचरणात आणूया !..

(- श्री. राजेंद्र पावसकर (गुरुजी), पनवेल.)

**१. प्रतिज्ञा आचरणात आणल्यास मुलांमध्ये राष्ट्राभिमान निर्माण होऊन ती राष्ट्र अन् संस्कृती यांच्या रक्षणासाठी सिद्ध होणे :**

'विद्यार्थी मित्रांनो, आपल्या पाठ्यपुस्तकाच्या पहिल्या पानावर प्रतिज्ञा लिहिलेली आहे. ती कशासाठी आहे ? आपल्या जीवनाची सर्व मूल्ये या प्रतिज्ञेत आहेत. प्रतिज्ञेप्रमाणे जगणे, हेच खरे शिक्षण आहे. ही प्रतिज्ञा व्यक्ती, समाज आणि राष्ट्र यांचा आत्मा आहे. आज आपण परीक्षार्थी झाल्यामुळे नैतिक मूल्यांपेक्षा गुणांना अधिक महत्त्व देतो. परीक्षेमध्ये 'प्रतिज्ञे'विषयी प्रश्न विचारले जात नसल्याने तिचा अर्थ समजून घेऊन त्याप्रमाणे वागणे आणि जगणे या गोष्टी आपल्याला गौण वाटतात. जोपर्यंत आपली ही स्थिती पालटत नाही, तोपर्यंत अपल्यामध्ये राष्ट्राभिमान निर्माण होणार नाही आणि आपण राष्ट्राच्या रक्षणासाठी सिद्ध होणार नाही. आपण सर्वांनी प्रतिज्ञेप्रमाणे जगण्याचा प्रयत्न करूया आणि राष्ट्र अन् संस्कृती यांच्या रक्षणासाठी सिद्ध होऊया.

**२. प्रतिज्ञेतील वाक्यांचा अर्थ :**

आता आपण या प्रतिज्ञेतील वाक्यांचा अर्थ समजून घेऊया.

२ अ. 'भारत माझा देश आहे !' :

आपण 'भारत माझा देश आहे', असे म्हणतो; परंतु आपल्याला तो 'आपला' वाटायला हवा. तरच आपण त्याची काळजी घेऊ आणि त्याचे संवर्धन करू.

जर प्रत्येकालाच ‘हा देश माझा आहे’, असे वाटले, तरच प्रत्येकजण देशाच्या रक्षणासाठी सिद्ध होईल. देशात कोणतीच समस्या रहाणार नाही आणि देश ‘सुजलाम् सुफलाम्’ होऊन देशाचा सर्वांगीण विकास हेईल.

३. ‘सारे भारतीय माझे बांधव आहेत !’ :

‘देशातील प्रत्येक व्यक्ती माझा भाऊ/बहीण आहे. ‘संपूर्ण देशच माझे कुटुंब आहे’, असा आपला व्यापक विचार असायला हवा; पण प्रत्यक्षात आपण असे वागतो का ? याचे उत्तर ‘नाही’ असेच आहे. जर आपण याप्रमाणे वागलो, तर एकमेकांमध्ये भांडणे होणार नाहीत. सर्वजण एकमेकांसमवेत आनंदाने रहातील. सध्या शाळेतील मुले वर्गातसुद्धा एकमेकांसमवेत भांडतात. एकमेकांना वाईट बोलतात. ‘हे विश्वची माझे घर’ असा व्यापक विचार असेल, तर रामराज्य येईल.

४. ‘माझ्या देशावर माझे प्रेम आहे !’ :

माझे माझ्या देशावर प्रेम आहे, तर देशातील प्रत्येक व्यक्ती आणि वस्तू यांवर आपण जिवापाड प्रेम करायला हवे. आपण असे वागलो, तर देशात एकही समस्या रहाणार नाही. देशातील प्रत्येक कुटुंब आणि पर्यायाने राष्ट्र आनंदी होईल.

५. ‘माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे !’ :

विद्यार्थी मित्रांनो, आपल्या परंपरा म्हणजेच आपली संस्कृती. आपली संस्कृती जगाला मार्गदर्शक ठरेल, इतकी उच्च आहे. ‘प्रत्येक व्यक्ती आनंदी रहावी’, अशी आपल्या संस्कृतीची शिकवण आहे. त्याग हीच आपली परंपरा आहे.

आपण एकमेकांना भेटल्यावर नमस्कार करतो. कपाळाला टिळा लावतो. अशा परंपरांचा आपल्याला अभिमान असायला हवा. या परंपरांमधूनच आपल्यामध्ये राष्ट्राभिमान जागृत रहाणार आहे. आपण आधुनिकतेच्या नावाखाली आणि पाश्चात्त्यांच्या अंधानुकरणामुळे हे सर्व विसरत चाललो आहोत.

६. 'त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी; म्हणून मी सदैव प्रयत्न करीन' :

परंपरांप्रमाणे आचरण करणे, म्हणजे त्यांचे पाईक होणे. आपले वागणे, बोलणे आपल्या परंपरांप्रमाणे असायला हवे; पण प्रत्यक्षात ते कसे होते, ते पाहूया. आपण दूरभाषवर 'नमस्कार' न म्हणता 'हॅलो' म्हणतो. आपल्या मुली आपल्या संस्कृतीनुसार पोषाख न घालता पुरुषांप्रमाणे जीन्स, टी शर्ट घालतात. त्या कुंकू लावत नाहीत. बांगड्या घालत नाहीत. आपण जर परंपरा पाळत नाही, तर आपण आपल्या परंपरांचे पाईक कसे होणार ?

७. 'मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन !' :

या प्रतिज्ञेतील वाक्याप्रमाणे आपण आपल्या आई-वडिलांना प्रतिदिन नमस्कार करत नाही. गुरुजनांचा आदर ठेवत नाही. काही मुले आपल्या गुरुजींची टिंगल करतात. हे सर्व पाप आहे. आजपासून आपण आपले आई-वडील आणि गुरु यांना प्रतिदिन वंदन करूया. आपण प्रत्येकाशी सौजन्याने वागलो, तर कुणाशीच आपले वैर रहाणार नाही.

८. 'माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करत आहे !' :

आपण अशी प्रतिज्ञा करतो; परंतु माझ्या देशबांधवांची प्रगती आणि देशाचे रक्षण यांसाठी मी काय करतो ? आपले शेजारी देश पाकिस्तान आणि चीन आपल्याशी युद्ध करण्याच्या सिद्धतेत आहेत. अशा कठीण परिस्थितीत आपण आपला देश, संस्कृती आणि धर्म यांच्याशी एकनिष्ठ असायला हवे.

९. 'त्यांचे (देश आणि देशबांधव यांचे) कल्याण आणि त्यांची समृद्धी यांतच माझे सौख्य सामावले आहे !' :

आपली प्रत्येक कृती इतरांच्या कल्याणासाठी हवी. इतरांची प्रगती झाली की, आपल्याला आनंद व्हायला हवा. आज आपल्याला समाजात आसुरी वृत्ती पहायला मिळते.

विद्यार्थी मित्रांनो, आपण प्रतिदिन शाळेत ही प्रतिज्ञा म्हणत असतो; पण 'त्याप्रमाणे कृती करायला हवी', असा विचारही आपल्या मनात आला नाही. आजपासून आपण या प्रतिज्ञेप्रमाणे जगण्याचा प्रयत्न करूया. छत्रपती शिवाजी महाराजांनी हिंदवी स्वराज्य स्थापनेची प्रतिज्ञा घेतली आणि ती पूर्ण केली. हे त्यांना कसे शक्य झाले ? शिवरायांनी त्यांची कुलदेवता भवानीमातेची भक्ती केली. आपणही आपल्या कुलदेवतेची भक्ती करूया. आपल्या कुलदेवतेचा नामजप करूया. प्रत्येक कृती करण्यापूर्वी देवतेला प्रार्थना करूया. मित्रांनो, भक्तीनेच शक्ती मिळते.'

मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांना इंटरनेटवर मानाचे स्थान असावे या उद्देशाने अनेक संस्था आणि व्यक्ती आज काम करत आहेत. ई साहित्य प्रतिष्ठान त्यातलीच एक. नेटाक्षरी हे **कवितांचे** ई साप्ताहिक, ई स्टाप हे **विनोदा**ला वाहिलेले ई नियतकालिक, दुर्ग दुर्गट भारी ही महाराष्ट्रातील दुर्ग **किल्ल्यांची माहिती** देणाऱ्या ई पुस्तिकांची मालिका, **स्वरनेटाक्षरी** हे मराठीतले पहिले ऑडिओ ई नियतकालिक, मराठी कसे लिहावे, ई पुस्तक कसे बनवावे, **शास्त्रीय संगीत** कसे ऐकावे (संगीत कानसेन) आदी ई लर्निंगची साधने, आणि आजवर प्रसिद्ध झालेली अनेक ई पुस्तके अशा आजवरच्या **दिडशेहून प्रकाशनांचा** पल्ला ई साहित्य प्रतिष्ठानने गाठला आहे. **सुमारे एक लाख वाचकांपर्यंत ही प्रकाशने पोहचतात.**




लहान मुलांना इंटरनेटच्या जगात प्रवेश करायला उपयोगी पडावे म्हणून सुरू केलेला बालनेटाक्षरी हा प्रयत्न आपल्याला कसा वाटला ते कळवा. तसेच ई साहित्य प्रतिष्ठान ची इतर प्रकाशने विनामूल्य मिळण्यासाठी लिहा व भेट द्या.

नवीन प्रकाशने नियमित मिळण्यासाठी

esahity@gmail.com

आजवरची प्रकाशने वाचण्यासाठी

www.esahity.com

